Stabilizer खरेदी साठी लागणा-या निविदा प्रक्रीयेस प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत...

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-१२२२/प्र.क्र.०३/आरोग्य-७

१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : २१ जानेवारी, २०२२

वाचा :-

(१) सहसंचालक, आरोगय सेवा (रुग्णालये), आयुक्त आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान यांचे कार्यालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक : राआसो/आयपीएचएस/७८८७८-८८२/२०२१, दिनांक : १०.११.२०२१.

(२) आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी दिनांक : २६.१२.२०२१ अन्वये मंजूर केलेली टिप्पणी,

(३) शासन निर्णय, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, क्रमांक : एचबीपी-२०१७/प्र.क्र. १६६/१७/औषधे-१, दिनांक : ३१.१०.२०१७.

प्रस्तावना :-

सहसंचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये), मुंबई यांनी संदर्भाधीन पत्र क्रमांक (१) अन्वये Outsourcing of biomedical equipment maintenance and repair अंतर्गत मे. फेबर सिंदुरी यांनी सूचविल्यानुसार Voltage fluctuation मुळे ७,७०२ उपकरणे वारंवार नादुरुस्त होत असल्याचे कळविले आहे. यास्तव, सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता पीआयपीमध्ये FMR Code ६.१.१.२५.१ (Any other equipment for hospital strengthening as per IPHS) अंतर्गत Voltage stabilizer च्या खरेदीसाठी रुपये २८३.७० लक्ष (रुपये दोन कोटी त्र्याऐंशी लक्ष सत्तर हजार फक्त) इतका निधी मंजूर झाला असल्याने, सदरील उपकरणांच्या खरेदी निविदा प्रक्रीयेस शासन स्तरावर प्रशासकीय मान्यता देण्याबाबत विनंती केली आहे.

आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी संदर्भाधीन क्रमांक (२) च्या मंजूर टिपणीन्वये सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता पीआयपीमध्ये FMR Code ६.१.१.२५.१ (Any other equipment for hospital strengthening as per IPHS) अंतर्गत Voltage stabilizer च्या खरेदीसाठी रुपये २८३.७० लक्ष (रुपये दोन कोटी त्र्याऐंशी लक्ष सत्तर हजार फक्त) इतक्या खर्चाच्या निविदा प्रक्रीयेस मंजूरी दिल्याचे कळविले आहे. त्यास अनुसरुन, Voltage stabilizer च्या खरेदीसाठीच्या निविदा प्रक्रीयेस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांच्या दिनांक : २६.१२.२०२१ च्या मंजूर टिप्पणीनुसार रुपये २८३.७० लक्ष (रुपये दोन कोटी त्र्याऐंशी लक्ष सत्तर हजार फक्त) इतक्या खरेदीच्या निविदा प्रक्रीयेस याद्वारे शासन स्तरावरुन प्रशासकीय मान्यता देण्यात आहे. त्याबाबतच्या तपशील पुढील प्रमाणे आहे. :-

| Sr. No. | Capacity of stabilizer suggested by FSMS | Total No. of stabilizer required as suggested by FSMS | Stabilizer per unit cost approved in PIP 2021-22 (Rs. In Lakh) | Approved budget in PIP 2021-22 (Rs. In Lakh) |
|---|---|---|---|---|
| 1 | 0.5 KVA | 2,945 | 0.025 | 73.63 |
| 2 | 1 KVA | 352 | 0.030 | 10.56 |
| 3 | 1.5 KVA | 38 | 0.035 | 1.33 |
| 4 | 2 KVA | 3,256 | 0.042 | 136.75 |
| 5 | 2.5 KVA | 1,000 | 0.053 | 53.00 |
| 6 | 5 KVA | 111 | 0.076 | 8.44 |
| **Total..** | | **7,702** | **0.261** | **283.70** |

सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता पीआयपीमध्ये FMR Code ६.१.१.२५.१ (Any other equipment for hospital strengthening as per IPHS) अंतर्गत Voltage stabilizer च्या खरेदीसाठी रुपये २८३.७० लक्ष (रुपये दोन कोटी त्र्याऐंशी लक्ष सत्तर हजार फक्त) इतक्या खर्चाच्या निविदा प्रक्रीयेस पुढील अटी व शर्तींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :-**

(१) सदर उपकरणे व सामुग्रीची आवश्यकता/मागणी याची शहानिशा/खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबींच्या खरेदीसाठी निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी. सदर प्रक्रिया खरेदी कक्ष, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांच्या स्तरावर करण्यात यावी.

(२) सदरहू उपकरणे व सामुग्रीचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती/अधिकारी) यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. तसेच, सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच याबाबींची खरेदी करण्यात यावी.

(३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक : भांखस-२०१४/प्र.क्र. ८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी

करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

(४) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे GEM Portal, इतर राज्यांचे दरकरार खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावा. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

(५) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व/पुरवठानंतर नमुना तपासणी (pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश (specification) असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

(६) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच, पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

(७) सदरहू खरेदीसाठी राबविण्यात येणारी निविदा प्रक्रीया ही शासन निर्णय, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, क्रमांक : एचीबीपी-२०१७/प्र.क्र. १६६/१७/औषधे-१, दिनांक : ३१.१०.२०१७ अन्वये राज्यातील शासकीय रुग्णालयांसाठी खरेदी करावयाच्या यंत्रसामग्री, उपकरणे, साधनसामुग्री व औषधे या बाबींचे तांत्रिक विनिर्देश निश्चित करण्यासाठी स्थापन करण्यात आलेल्या समितीने दिलेल्या मान्यतेनुसार करण्यात यावी.

(८) निविदा प्रक्रीयेवरील खरेदीबाबतचे प्रमाणपत्र (Reconcillation Certificate) सहसंचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये), मुंबई यांनी सादर करावे.

(९) निविदा प्रक्रीयेनुसार राबविण्यात येणा-या खरेदी पध्दतीत द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

(१०) संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

(११) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अ.क्र. ४ नियम क्रमांक-७ समोरील स्तंभ क्रमांक-६ येथील अटींची पूर्तता करण्यात यावी.

उपरोक्त अनुक्रमांक १ ते ११ येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची व खरेदी नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी सहसंचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये), मुंबई व सहसंचालक, आरोगय सेवा (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांची राहील.

०२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अनु क्रमांक ४, नियम क्र. ७ अन्वये अवजारे, किरकोळ साधन सामग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास मंजूरी देण्यासाठी प्रशासनिक विभागास पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आले आहेत त्यानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

०३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१२०१५५१०६०११७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO

Digitally signed by LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=047af7706d4845170e3864b62c8bc6b380c78f11ce6607746c0b15e934fc8284, pseudonym=91CF303CCF98AAFBC28FD87C6A71DA717A6A7250, serialNumber=8902AEDC74F3CACF3FB967FF5955AAF5DCBFDD2C053872C04B5E4671EF77EC30, cn=LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
Date: 2022.01.21 14:15:04 +05'30'

(वि. ल. लहाने)

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

(१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
(२) सहसंचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये), मुंबई.
(३) सहसंचालक, आरोगय सेवा (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई
(४) संचालक, आरोग्य सेवा (१), मुंबई.
(५) संचालक, आारोग्य सेवा (२), पुणे.
(६) संचालक (वित्त व लेखा) आरोग्य सेवा, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
(७) सहसंचालक (तांत्रिक). राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
(८) वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग (औषधे-१), मंत्रालय, मुंबई.
(९) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा-१/लेखा व अनुज्ञेयता-१), मुंबई.
(१०) निवडनस्ती (आरोग्य-७), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.